**सन २०१७-१८ करिता वनविभागाचे संगणकीकरण (२४०६८६६९) या राज्य योजनेतंर्गत योजनेचा चालू बाब प्रस्ताव.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१७/प्र.क्र.८८/फ-२**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :-२३ जुन, २०१७**

वाचा :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१७.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२३ (८६६९)/२०१७-१८/२५५, दि.१५.०५.२०१७.

**प्रस्तावना :-**

सन २०१७-१८ करिता “वनविभागाचे संगणकीकरण” (२४०६८६६९) या योजनेकरिता एकूण रु.१०००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. त्या पैंकी ८०% म्हणजेच रु.८००.०० लक्ष इतका निधी वन विभागाच्या संगणकीकरण या योजनेकरिता अर्थसंकल्पीत आहे.

२. सन २०१७-१८ च्या सुधारीत अंदाजात सदर योजनेकरिता रु.१०००.०० लक्ष इतकी तरतूद दर्शविली असल्याने त्यापैकी ८०% म्हणजेच रु.८००.०० लक्ष लक्ष इतका निधी वितरणाकरिता उपलब्ध आहे. त्यामुळे, सदर योजनेअंतर्गत उर्वरित अर्थसंकल्पित निधीच्या अनुषंगाने रु.१०००.०० लक्ष रक्कमेचा नवीन बाब प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये शासनास सादर केला असून सदरची रक्कम वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

३. वनविभागाचे संगणकीकरण करणे या योजनेअंतर्गत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विभाग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावातील नमूद कामांकरिता सन २०१७-१८ च्या सुधारीत अंदाजात सदर योजनेकरिता रु.१०००.०० लक्ष इतकी तरतूद दर्शविली असल्याने त्यापैकी ८०% म्हणजेच रु.८००.०० लक्ष लक्ष इतका निधी वितरणाकरिता उपलब्ध आहे. त्यानूसार **रु.८००.०० लक्ष - (२८- व्यवसायीक सेवा रु.१२०.०० लक्ष, ५०- इतर खर्च रु.६८०.०० लक्ष)** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. मागील वर्षी सदर योजनेकरिता वितरित केलेल्या निधीच्या विनयोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील दि.१८.०४.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तीची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी. तसेच वन विभागाचे संगणकीकरण करणे या योजनेकरिता वेळोवेळी निर्गमित केलेल्या धोरणात्मक शासन निर्णयांमधील अटी व शर्तीची पूर्तता केली जाईल याची दक्षता घेण्यात यावी.

५. सदर योजनेवर होणारा खर्च महसूल व वन विभाग, मागणी क्रमांक :- सी-७, प्रधान लेखाशिर्ष :- २४०६, वनीकरण व वन्यजीवन, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, राज्य योजनांतर्गत योजना, (१७) वन विभागाचे संगणकीकरण, (१७) (०१) वन विभागाचे संगणकीकरण (५० - इतर खर्च), (२४०६ ८६६९) या लेखा शिर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१८.०४.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र/१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५.०५.२००९ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२७११३७२९१८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Atul Ashok Kode
Date: 2017.06.27 11:34:32 +05'30'

**( श्री.अतुल कोदे )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

६) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२

७) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

८) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

९) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

१०) निवडनस्ती , फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.